**करमाळा पंचायत समिती (जि.सोलापूर) कर्मचारी निवासस्थान इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०१७/प्र.क्र.२२७/बांधकाम-४**
मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
तारीख: २५ जानेवारी,२०१९

वाचा:-

1) **अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,सोलापूर यांचे पत्र क्र. जिपसो/बांखा-२/प्रकल्प-२/ १०१४/ २०१७, दिनांक ०७.११.२०१७**

**प्रस्तावना:-**

१. अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांनी वरील पत्रान्वये करमाळा पंचायत समिती येथे पंचायत समितीच्या कर्मचारी यांना निवासस्थान इमारत बांधकामाचा प्रस्ताव सादर केला आहे. वरील प्रस्तावात एकूण १६ निवासस्थाने सिटी सर्वे नं. ३९९४ मध्ये बांधण्याचे प्रस्तावित आहेत. त्यामुळे पंचायत समिती करमाळा यांच्या मागणी व गरजेनुसार टाईप-I प्रकारातील १२, व टाईप-II प्रकारातील ४ निवासस्थानांच्या बांधकामाचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. अति मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सोलापूर यांनी करमाळा निवासस्थान बांधकामाकरीता मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा.बां. मंडळ मुंबई यांच्या कडील नमुना नकाशा टाईप-I व II जॉब क्र. टी-आरईएस-५१६१/३/४ व ५१६२/३ उपयोगात आणला आहे. यासाठी सन २०१७-१८ च्या दरसूचीवर आधारीत एकूण रु. २४५.६६ लक्ष किंमतीचे अंदाजपत्रक सादर केले आहे. सदरील अंदाजपत्रक उप अभियंता जि.प.(बांध), व कार्यकारी अभियंता (बांध) जिल्हा परिषद, सोलापूर यांनी साक्षांकीत केले आहे. प्रस्तावासोबत कामाचा नमुना नकाशा, अंदाजपत्रक, जागेचा ले-आऊट, पं.स. ठराव इ. कागदपत्रे सादर केली आहेत.

३. अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प., सोलापूर यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या छाननी अंती, करमाळा पंचायत समिती येथील पंचायत समितीची कर्मचारी निवासस्थान इमारत बांधकामाच्या टाईप-I प्रकारातील १२ व टाईप-II प्रकारातील ४, अशा एकूण १६ निवासस्थान बांधकामाच्या एकूण रु.२,४५,६६,०००/- इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

४. पंचायत समिती करमाळा (जिल्हा-सोलापूर) येथील कर्मचाऱ्यांसाठी टाईप-I प्रकारातील १२ व टाईप-II प्रकारातील ४ अशा एकूण १६ निवासस्थान बांधकामाच्या एकूण रु. २,४५,६६,०००/- ( अक्षरी रुपये दोन कोटी पंचेचाळीस लक्ष सहासष्ट हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीस पुढील अटीं-शर्तीच्या अधिन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

१) करमाळा (जिल्हा-सोलापूर) येथील पंचायत समितीच्या कर्मचारी निवासस्थान इमारत बांधकामाच्या टाईप-I प्रकारातील १२ व टाईप-II प्रकारातील ४, अशा एकूण १६ इमारतींचे बांधकाम ज्या जागेवर करावयाचे ती जागा प्रथमत: जिल्हा परिषद/ पंचायत समितीच्या स्वत:च्या नावावर करुन घेणे बंधनकारक राहील.

२) नियोजित निवासस्थान इमारतीचे बांधकाम जुनी इमारत पाडून करावयाचे असल्यास बांधकाम सुरु करण्यापुर्वी संबंधित अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, प्रादेशिक विभाग यांच्याकडून प्रथमत: अस्तित्वातील जुन्या इमारतीचे स्ट्रक्चरल ऑडीट करुन घेण्यात यावे, त्यानुसार अस्तित्वातील इमारत वापरण्यास अयोग्य असावी.

३) करमाळा (जिल्हा-सोलापूर) येथील पंचायत समितीच्या कर्मचारी निवासस्थान इमारत बांधकामाच्या टाईप-I प्रकारातील १२ व टाईप-II प्रकारातील ४ बांधकामाकरीता प्रस्तावित करण्यात आलेल्या आराखड्यास बांधकाम सुरु करण्यापुर्वी प्रथमत: मुख्य वास्तुशास्त्रज्ञ/प्रादेशिक उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांची मान्यता घेणे तसेच, अग्निशामन यंत्रणेची मंजूरी घेणे आवश्यक राहील.

४) विहीत नमुना आराखड्यानुसार कामे हाती घेताना, स्थानिक नगररचना प्राधिकरणाची मंजुरी घेणे बंधनकारक राहील.

५) या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास प्रथमत: सक्षम प्राधिकाऱ्याकडून त्वरेने तांत्रिक मान्यता घेणे बंधनकारक राहील.

६) प्रस्तुत निवासी इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अंमलात आणून, नैसर्गिक प्रकाशयोजना व वायुविजन, पाण्याच्या व उर्जेच्या वापरात काटकसर, पर्जन्य जलपुन:भर्रण आणि जास्तीत जास्त पर्यावरणपूरक बांधकाम साहित्य व साधन-सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.

७) प्रत्यक्ष बांधकाम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे नियोजन करुन, इमारत बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबंधित कार्यकारी अभियंता (बांध.) जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

९) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबंधित कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी. या कामावर प्रशासकीय मान्यते पेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती / जिल्हा परिषदेने सोसावा.

५. पंचायत समिती करमाळा (जिल्हा-सोलापूर) येथील निवासी इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे:-

| GENERAL ABSTRACT OF KARMALA RESIDENTIAL QUARTER FOR STAFF ZILLA PARISHAD SOLAPUR | | |
|---|---|---|
| Sr. No. | Description of item | Amount (in Rs) |
| 1 | Cost Of Type I-12 Quarters | 10412351.00 |
| 2 | Cost Of Type II-04 Quarters | 5127114.00 |
| | **Total A** | **15539465.00** |
| 5 | Add 11% For Electrification Charges | 1709341.00 |
| 6 | Add 5 % Water supply Charges | 776973.00 |
| 7 | Add 1% SQM Charges | 155395.00 |
| 8 | Add 1% Computrised Charges | 155395.00 |
| 9 | Add 6% Price Variation Charges | 932368.00 |
| 10 | Add For Fire Fighting | 1000000.00 |
| 11 | Add for Road & Parking development | 1500000.00 |
| 12 | Add for 18 % for G.S.T Charges | 2797104.00 |
| | **Grand Total** | **24566040.00** |
| | **Says Rs.** | **24566000.00** |

६. या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याकडून त्वरेने तांत्रिक मान्यता घेण्यात येवून त्याची प्रत शासनास सादर करावी.

७. प्रस्तुत कामाची माहिती कंस्ट्रक्शन ट्रॅकर प्रणालीवर अद्ययावत करावी.

८. उपरोक्त बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल. या कामावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०५) जिल्हा परिषदांच्या निवासी इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने- (२५१५१२५६)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

९. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

१०. सद्र शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९०१२५१३३०२४४६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development And Water Conservation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e461e0a32ec649f0a60e4372f7cbbb3edff433d33cc0d95db6f8dbf1fa4f7f, cn=Dilip Babasaheb Patil
Date: 2019.01.28 10:03:21 +05'30'

( दि.बा.पाटील )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद
२) विभागीय आयुक्त पुणे विभाग, पुणे
३) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर
५) अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर
६) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर
७) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, सोलापूर
८) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा सोलापूर
९) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुबंई.
१०) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा पुणे विभाग, पुणे
११) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, सोलापूर
१२) सभापती, पंचायत समिती, करमाळा, जिल्हा सोलापूर
१३) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, करमाळा, जिल्हा सोलापूर
१४) निवड नस्ती, कार्यासन क्र.बांधकाम-४ ग्राम विकास विभाग,बांधकाम भवन मुंबई